यांच्या घोड्यांवर बसून पळून गेले. दुसऱ्या दिवशीं पुणें शहरांत येऊन मीं शोध केला तेव्हां असें कळलें कीं, आपण कांहीं दरबारी कामाकरितां साताऱ्यास गेलां. म्हणून मी आणि माझा मित्र असे दोघे साताऱ्यास आलों, आणि हुजुर मुलाखतीस ज्या दिवशीं जावें असा आम्हीं दोघांनीं इरादा केला होता त्याचे आदले दिवशीं हरिपंतास रस्त्यांत पाहिलें आणि त्याचा आणि तात्यासाहेबांचा तोंडवळा सारखा आहे, असें पाहून मीं असें ताडलें कीं, हेच तात्यासाहेबांचे पुत्र असावेत. मग मीं रात्रीं त्यांच्या देवडीसमोर निजावयास जागा मागून घेतली. आणि पुढें मध्यरात्रीच्यावेळीं शेजारच्या भिंतीपलीकडे हरिपंत आणि त्यांचे मित्र अंतोपंत यांचा खोट्या खतांच्या संबंधाच्या पत्रव्यवहाराविषयीं कांहीं संवाद ऐकिला. त्यावरून तात्यासाहेब निरपराधी आहेत, अशी माझी खात्री झाली, आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं हरिपंताच्या मुलाखतीस गेलों. त्यांच्याजवळ मीं खोट्या खतांच्या संबंधाचा पत्रव्यवहार मागितला, परंतु त्यांनीं मला फसवून तळघरांत लोटून दिलें. तेथून मी सुदैवानें बाहेर पडलों आणि मग कोणत्या रीतीनें हरिपंतास त्याच्या दुष्ट कृत्याबद्दल पारिपत्य करावें याचा विचार करितां करितां स्त्रीवेष घ्यावा असें मला जरूर वाटलें. ती ओंगळ आणि नामर्दपणाची हिकमत लढविण्यास माझें मन घेईना, परंतु निरुपायास्तव मग मीं स्त्रीवेष घेऊन हरिपंतापर्यंत मोठ्या युक्तीनें प्रवेश करून घेऊन त्यांच्या तोंडानें पत्रव्यवहार कोठें आहे वगैरे ऐकि-

त्याबरोबर स्त्रीवेष टाकला आणि हरिपंतास त्यांच्या नीच कृत्यांबद्दल देहांत शिक्षा करणार होतों इतक्यांत हुजुराकडून शिपाई आले. यापुढची हकीकत आपणांस माहीत आहेच.

**बाजीरावः**-बिल्वकनाथ, तुझ्या चातुर्याबद्दल तुझी तारीफ करावी तितकी थोडीच आहे. बरें, त्या ह्मातारीनें आह्मांस जें पत्र लिहिलें आहे तें इकडे आण पाहूं. (बिल्वकनाथ पत्र देतो तें घेऊन वांचून) तात्यासाहेब तुह्मी आपल्या मुलास कडकडून भेटा. हा जो बैरागी तुमचेपुढें उभा आहे तो तुमचा मुलगा.

**तात्यासाहेबः**--(स्तब्ध उभे राहतात.)

**बाजीरावः**--तुह्मीं हें पत्र वाचलेंत ह्मणजे सर्व गोष्टींचा खुलासा होईल.

**तात्यासाहेबः**-(पत्र वाचतात.)

श्रीमंत राजवर्य बाजीराव साहेब पेशवे यांस विज्ञापना अशी आहे कीं, मी पंधरा वर्षांमागें सातारा येथें राहत असें. तेथें बाळकृष्णपंत ऊर्फ तात्यासाहेब कोल्हटकर ह्मणून कोणी गृहस्थ राहत असत. त्यांच्या दोन वर्षांच्या मुलास आपण मारून टाकावें असें त्यांचा वडील मुलगा हरिपंत याच्या मनांत येऊन त्यांनें त्याची मुंडी मुरगळण्याचें काम मजकडे सांगितलें. परंतु त्या बाळाची मला दया येऊन त्याला मीं घरांत गुप्तपणें ठेविलें. मग कांहीं दिवसांनीं तेथें राहणें ठीक नाहीं, असें समजून उत्तर हिंदुस्थानांत मकोणा गांवीं येऊन त्या बाळासह राहिलें, आणि त्याचा चांगला सांभाळ केला. आणि हरिपंतानें मला

माझ्या कृत्याबद्दल दहा हजार रुपये दिले होते त्यावर इतके दिवस गुजारा केला. परंतु म्हातारपणीं आई-बापांस पुत्रवियोग घडविल्याचें पाप माझ्या अंतःकरणांत डंवचूं लागलें. त्यावरून हें पत्र आपणांस लिहिलें. तात्यासाहेब कोल्हाटकर किंवा त्यांचा कोणी नातलग जिवंत असेल तर हें पत्र घेऊन येणारा मुलगा त्याचे स्वाधीन करावा. जर कोणी नसेल तर हा मजकूर त्यास न कळवितां त्यास परत पाठवून द्यावें. या पत्रासोबत एक आंगठी पाठविली आहे, ती ह्या मुलास मारावयाकरितां जेव्हां हरिपंतानें त्याला माझे स्वाधीन केलें त्यावेळीं त्याचे हातांत होती. ती खुणेदाखल पाठविली आहे, कळावें.

सही–यशोदाबाई कोम नारोपंत जोशी.

**तात्यासाहेबः**–आंगठी कोठें आहे पाहूं?

**बिल्वकनाथः**–( आंगठी पुढें करितो. )

**तात्यासाहेबः**–( आंगठी घेऊन पाहून आणि ओळखून बिल्वकनाथास कंवटाळतो. ) सदाशिवा, तूं आमच्या नशीबानें आह्मांस प्राप्त झालास. ( अश्रु ढाळितो. ) देवा! तुझी लीलाअगाध आहे. माझा सदाशीव मला पुन्हां मिळवून दिलास! सदू! जा आपल्या आईस भेट.

**सगुणाबाईः**–ये बाळा सदू! ( कंवटाळते ) खचीत आमचें नशीब बळकट ह्मणूनच तूं आमच्या पुन्हां दृष्टीस पडलास. लहानपणीं तुझ्या उजव्या कुशीस एक तुळशीपत्राची खूण होती ती पाहूं. (पाहून ) माझाचरे सदू तूं, माझाच. ( कवटाळून अश्रू ढाळिते. )

बाजीरावः—सगुणाबाई, तुह्मांस छळिल्याबद्दल नारोबा कोतवालास काय शिक्षा करावीसें तुह्मांस वाटतें.

सगुणाबाईः—यजमान आणि मी सर्व संकटांतून पार पडून एकमेकांस भेटलों. आमचा सदू पुन्हा आह्मांस मिळाला, या आनंदांत नारोबाविषयीं माझ्या मनांत कांहिंदेखील राग उरला नाहीं.

बाजीरावः—पण, आह्मी त्यास ज्या कामावर नेमला होता त्यामध्यें त्यानें अशी हरामखोरी केली ह्मणून त्यास आमच्या मुलखांतून हद्दपार करवून त्याची सर्व जिंदगी जप्त केली पाहिजे. येश्या,

येश्याः—(येऊन मुजराकरून )जी सरकार.

बाजीरावः—येश्या, लक्ष्मणराव फौजदारास सांग जा कीं तावडतोब पुण्यास जाऊन नारोबा कोतवालास हद्दपार करावें आणि त्याची सर्व चीजवस्त सरकारांत जप्त करून टाकावी.

येश्याः—(मुजरा करून ) जी सरकार. (जातो).

बाजीरावः—तात्यासाहेब, तुह्मांला कांहीं मागावयाचें असेल तर मागा.

तात्यासाहेबः—हुजूरपाशीं माझी एक विनंती आहे, माझा मुलगा हरि यानें जरी अह्मांस इतक्या संकटांत घातलें तरी त्याचेविषयीं आमचे मनांत कांहीं राग नाहीं. कारण (डोळ्यांस पाणी आणून) तो या जगांतून नाहींसा झाला आहे. आतां पितृप्रेमानें मीं आपल्यापाशीं हें मागतों कीं त्याचा अंतोपंताशीं झालेला हा (बोट दाखवून) पत्रव्यवहार जाळून

टाकून त्याच्या दुष्कृत्यांचा पुरावा नाहींसा करून टाकवा आणि ही सर्व हकीकत छपवून टाकावी.

**बाजीरावः**–बरें आहे. सदू, हा पत्रव्यवहार फाडून टाक पाहूं.

**सदूः**-( फाडतो. )

**तात्यासाहेबः**-ज्या अपराधांत हरि सांपडला त्याच अपराधांत अंतोपंतही गुंतला असल्यामुळें त्याला कांहीं सजा करूं नये अशी हुजूरपाशीं माझी आणखी एक विनंति आहे.

**बाजीरावः**–तात्यासाहेब, अंतोपंत बदचालीचा मनुष्य आहे त्याअर्थी त्याला सातान्यासारख्या शहरांत राहूं दिला तर अशींच दुष्कृत्यें तो पुन्हां करील, यासाठीं त्याची चीजवस्त कांहीं जप्त न करितां त्याला आमच्या मुलुखांतून हद्दपार करवितों. ( सदूस ) सदू, तुला कांहीं मागावयाचें असल्यास माग.

**सदूः**–खाविंद, मला दोन गोष्टी आपल्यापाशीं मागावयाच्या आहेत. माझ्या पालन करणारीस माझा प्राण हरण करण्याच्या इराद्याबद्दल माफी देऊन पुन्हां सातान्यास येण्यास मोकळिक द्यावी. म्हणजे ती आमचे घरीं म्हातारपणीं सुखानें प्राणत्याग करील.

**बाजीरावः**–बरें आहे. तुझी दुसरी विनंती ऐकूं दे.

**सदूः**– दुसरी विनंति अशी आहे कीं माझ्या आईबापांची अल्प सेवा माझ्या हातून घडली म्हणून आपण आपल्या हातानें मला शाबासकी द्यावी— ( जवळ जाऊन पाठ पुढें करतो. )

**बाजीरावः**–( पाठ थोपटतो आणि शेवटचा हात मारतो. ) कां सदू, पुरे झालींना शाबासकी?

**सदूः**–पुरे झाली सरकार.

**बाजीरावः**–तात्यासाहेब—आणखी कांहीं प्रिय मागावयाचें असल्यास मागा.

**तात्यासाहेबः**–सरकार, मी आणि माझें कुटुंब संकटांतून मुक्त झालों. आमचा पुत्र आम्हांस पुन्हां भेटला. हरीच्या गुन्ह्यांचा पुरावा नाहींसा झाला. आतां याउपर प्रिय तें काय मागावयाचें राहिलें आहे? तथापि खाविंद, ज्याअर्थी आपण विचारतां त्याअर्थी मी सर्व प्रजेच्या तर्फेनें हें मागतों:–कीं आपण सर्व प्रजेस अशाचप्रकारचा न्याय देऊन तिला नेहमीं संतुष्ट ठेवावें, तसेंच दक्षिणा वगैरे देऊन ब्राह्मणांस नेहमीं संतुष्ट ठेवावें. आणि यज्ञ वगैरे करून इन्द्रादि देवतांस प्रसन्न करावें.

**बाजीरावः**–बरें आहे. असें करावयास झटणें हें तर आमचें पहिलें कर्तव्य होय.

( पडदा हळू हळू पडतो )

**समाप्तः**

---

बळ्या, अरे तुझी ही दीन माय हाय हाय करून दीर्घ-स्वरानें हाका मारीत आहे, तरी तुला ऐकूं येत नाहीं काय? सगुण्या, अरे तुला मी न्हाऊं न घालून मांडी-वर न बसवितां जमीनीवरच टाकिलें, ह्मणून रुसलास कायरे! बाळा, तुझें तें सुंदर मुखकमळ आतां मी कुठं पाहूं? तुला न्हाऊ घालून आतां निजायच्यावेळेस अंगाई अंगाई कोण करीत जाईल? बाबा, तुला मांडी-वर घेऊन स्तनपान कोण करील? शिव शिव परमेश्वरा; कसारे ह्या अनाथ कन्येवर घाला घातला? अशी म्यां काय दुर्वतणूक केली म्हणून त्याचें फळ मला हें दाखविलेंस? तुला तुझे प्रेमळभक्त दीनवत्सलादीक विशेषणें देतात तर त्याची तुला काडीमात्र लज्जा वाटत नाहीं! एकूण तुला सत्याचा अभीमान बिलकूल नाहीं असें म्हटलें तरी चालेल. (आपणांशीं) देवा, तुझ्यावर तरी बोल ठेऊन काय उपयोग? प्रारब्धीं असेल तें भोगलेंच पाहिजे. हायरे दुष्टा दुर्दैवा, कसारे हात धुवून माझ्यापाठीस लागलास? देवा, किती आतां अंत पहाणार? अरे, ही कन्या तुला काया, वाचा म-नेंकरून शरण आली तिचा तुझ्या सारख्या थोर व कनवाळु जनानें तिरस्कार करावा हा सज्जनांचा धर्म कीं काय? (स्तनाकडे पाहून) हर हर! लाडक्या, येरे चिमण्या लौकर; हें दुध व्यर्थ वाया जात आहे; ह्या निर्दयी मातेनें तुझ्यावर दुर्लक्ष केलं ह्मणून माझ्यावर, रागावलास कीं काय! हर हर! प्राणपते, तुम्हीही माझा त्याग

करून मला वनवासी कसं केलंत? परमेश्वरा! सुभाग्यें-करून जर त्यांची गाठ पडली आणि मोठया हर्षानें व प्रेमानें मला 'बालक कोठें आहे' ह्मणून विचारलं तर मी काय उत्तर देऊं? ( रडूं लागले. ) बाबा, आतां तुला कुठें रे पाहूं? येथें बसून तरी आतां उपयोग काय? [उसासा टाकीत रडते]

वसंततीलका.

रानीं जसी फिरतसे भरताचि माता ॥
शकुंतलासम गमे, नवचोरुगात्रा[२] ॥
ती हिंडते चमकते विज काय वाटे ॥
नाहीं कधीं चुकत तें लिहिलें ललाटें[३] ॥ १[१] ॥

हे आम्र कदंबादिक वृक्षांनों, ह्यावेळेस तुम्ही माझे बांधव आहांत तर कृपा करून माझा बालक कोण दुष्ट घेऊन गेला आहे हें कृपाकरून मला निवेदन करा. माते धरत्री, ही अनाथ कन्या आतां अगदीं दीन होऊन उघडी पडली आहे तर, हे आई, कृपा-करून माझ्या तान्हुल्यासह मला तूं आपल्या विशाळ उदरीं जागा दे. [ जरा पुढें जाते ] अहाहा. माझें बाळ येथेंच आलें असेल काय! नदीचें पाणी तरी किती स्वच्छ असून खळखळां वाजतें. चहूंकडे आका-शास वरचेवर अवलंबून धरणारे वृक्ष तरी कसे घन-दाट उभे आहेत. रात्र जशी किर्र बोलते! डोळ्यांत

---

१ शृंगारवल्लरी. २ शकूंतलेचें विशेषण. ३ कपाळीं.

बोट घातलं तरी दिसत नाहीं! परमेश्वरा, अशा भयानक रात्रीच्या समयास येखादा वाघ येऊन मला खाईल तर फार बरं. [ आणखी पुढें जाऊन ] काय मी ह्यावेळेस आपल्या नशीबाचं वर्णन करूं! [ जवळ विहीर पाहून तेथें जाते ] हे विहिरी माते, आजपर्यंत तूं हजारों स्त्री पुरुषांस आणि जलचरांस पाणी पाजलंस त्याप्रमाणं मलाही आतां शेवटचं पाणी पाज ह्मणजे झालं! नेत्र उघडून धडधडीत आत्महत्या करण्याचं भय वाटतं तर आतां तोंडावरून मी आपल्या लाल पातळाच्या पदराचा बुर्खा घेते. आत्महत्या घडली तरी चिंता नाहीं, परंतु स्वर्गास तर देवादिकांची पूजा व सेवा स्वस्थमानसें करून स्वस्थ राहीन. आतां फार बोलून उपयोग नाहीं, न जाणो कदाचित् माझ्या विहिरीमातेची भेट होणार नाहीं. [ असें ह्मणून दोन्ही करांनीं पदराच्या बुर्ख्यासह डोळे घट्ट मिटून टाकते ]. जय विहिरी आई, घे आतां पोटांत! ( असें ह्मणून उडी टाकूं लागते तों जसा प्रळयकाळीं मोठ्या सपाऱ्यानें वीज कडाडून तिचा आवाज होतो तसा आवाज झाल्याबरोबर ती वेल्हाळी दचकून भयानें एकदम तशीचे तशीच मूर्छित होते. )

( पडदा पडतो )

**प्रवेश ५ वा समाप्त.**

---

# अंक ४ था.

---

## प्रवेश १ ला.

---

स्थळ–अवंती नगरी, राजवाड्यांतील एक महाल.

पात्रें

माधव....................द्विज पुत्र.
चंपकमालती ( प्रधान कन्या ) रतिप्रियेची
सखी अ. माधवाची विवाहित स्त्री.
एक शिपाई

भुजंग प्रयात.
फुलाचे तुरे हार गोंदीत बैसे ॥
सकूमार बाळा प्रतीमाच भासे ॥
पती पातले पाहुनी राजहंसी ॥
उभी राही एकीकडे मस्करीसी ॥

माधव–[ आपणांशीं उघड ] काय बुआ, लग्नाला पुरतें आठ एक दिवस सुद्धां झाले नाहींत, तोंच हार, तुरे, गजरे, आदी करण्याचा इतका छंद. मग ऐन रतिसुखाचे दिवस आले तर इकडचा डोंगर तिकडे

---

१ चंपकमालती. २ लक्ष्मीवत्. ३ माधव.

होईलसें वाटतें ! कांहीं तरी उद्योग करीत असावा हें खरें !

**चंपकमालती**–[ मुरका मारून.] आहाहा ! पुरे मेलं. थट्टा केल्याशिवाय एक घटकाभर सुद्धां राहवत नाहीं !

**माधव**–( हसून.) अग असें नाहीं. सहज मी आपलें म्हटलें कीं, अझून कशास कांहीं ठिकाण नाहीं तों इतका नाद आणि ईश्वरकृपेंकरून थोड्याच दिवसांनंतर जर तेही दिवस आले तर आकाश पाताळ एकच होईलसें वाटतें !

**चंपकमालती**–( गालीं हंसून खालीं मान घालते ) अहाहा! काय बाई तरी ! ते दिवस यायला जशीं शिंगंच उरलीं वाटतं ! आणखीं ते दिवस कसे यावेत? सर्व ऋतूंमध्यें श्रेष्ठ काय तो ऋतु वसंत आणि त्या ऋतूंत ह्या स्त्रीरूपी वृक्षांस तारुण्यरूपीं नूतन पालवी फुटून चेष्टादीक हावभाव हींच कोणी पुष्पें फुटून विनोदास्पद भाषणरूपी सुगंध सुटून प्रेमरूपी भाषण हाच कोणी स्त्रीरूपी वृक्षांचा मद गळत आहे; तरी त्या तारुण्यवसंतास संतत उसंत देणाऱ्या भ्रमररूपी पतिराजास अजून संशयच वाटतो ! [ असें ह्मणून गालांत खदखद हंसते ].

**माधव**–( हर्षानें ) आय हाय ! आज बोलण्याचा रोख निराळाच दिसतो ! आज मनामध्यें कांहीं दुसरीच गोष्ट आलीसें वाटतें. मग क्नांय असेल तें असो ! [ जवळ जाऊन आलिंगन देतो व उभयतां मंचकावर हर्षभरीत बसतात ].

चंपकमालती–प्रिया, माझ्या मनांत दुसरं काय असायचं? जसा ह्या दासीचा आपण अंगीकार केला तद्वत् पाणिग्रहणही करावं ह्मणजे झालं.

माधव–अहाहा! 'नवरा मूल ह्मणतो कीं मला लग्नाला न्याल कीं काय? तसं तूं आपलें करतेस. प्रिये, मी तुला पाणिग्रहण करीन म्हणून जें वचन दिलें, त्या वचनांत, प्राण गेला तरी चिंता नाहीं, परंतु अंतर पडणार नाहीं!

चंपकमालती–असो. प्राणनाथ, लग्नाचा बरोबर आज आठवा दिवस असून, आयास न करतां अनायासें येथें एकांतांत आहों तर दासीकडून थोडीशी सेवा घ्यावी ( असें बोलून लाजते )

माधव–सेवा आणि पुढं? अशा अर्धवट बोलण्याचा मला कांहीं अर्थच समजत नाहीं.

चंपकमालती–पुढं काय? सेवा घ्यावी! [गालांत हंसते]

माधव–फार चांगलें आहे. माझ्याही मनांत तेंच होतें!

चंपकमालती–झालं तर, आपल्याकडून हो असल्यास माझ्याकडून ना म्हणून बिलकुल नाहीं. खुशाल मंचकावर रात्रभर बसावं. मी आपली चरणसेवा करीन.

माधव–मग, पलंगावर रात्रभर बसलें तर पाठीला कळ नाहीं का लागायची?

चंपकमालती–( तोंडावर पदर घेऊन हळूंच हंसते ) काय बाई तरी, आतां मला पुढें बोलण्यास लाज वाटते [ इतक्यांत एक दासी पानसुपारीचें तबक आणून ठेवून आपण निघून जाते ].

माधव–( उभयतां तांबुल भक्षण करून ) अहाहा! प्रिये,

शार्दूल विक्रीडित.

तोंडातें कमला ह्मणूं तरि अतां निस्तेज तें जाहलें ॥
चंद्रातें क्षय जाणती सकळही तेंही नसे चांगलें ॥
नाकातें जरि नाशिकाशुक ह्मणूं तोही मनीं लाजला ॥
भाळीं कुंकुम व्योमिं* चंद्र दिसतो कीं लाल गे भासला॥ १
सांबाच्या सुजटा मला मनिंगमे गंगौघ तो भांग हा ॥
सर्पासारिखि लांब वेणि तुझिगे वाटे मला काय हा ॥
दंशावाचुनि जाळितो, प्रियसखे, कामी जना सर्प हा ॥
वाटे मानसिं हर्ष फार मनिंगे कीं जाहला लाभ हा॥ २
नेत्राच्या भृकुटीस, गे, प्रियसखे, नाहीं दुजी ऊपमा ॥
राजीवावत् भासतात, सगुणे, हे नेत्र कीं दीपमा ॥
चुंबीतां तव लाल गाल अधरा तेजस्वि ते दीसती ॥
ह्यासाठीं मजला सुचे न उपमा, पुष्पा गुलाबाचि ती॥ ३॥
कंठीं घालुन माळ, नांकिं नथ ती हारादिकां गे प्रती॥
कर्णीं वेष्टुन वेल काय, सगुणे, बाळ्या कशा लोंबती ॥
नेसूनी हिरवें नवें, जरतरी हें लुगडें चोळि ती ॥
अंगीं तंग बसे, कुचांस उपमा नाहीं, प्रिये योग्य ती ॥ ४
तारुण्यें मदनें तुझे कुच जसे वाटे मला चेंडु गे ॥
हस्तानें शिवतां तयां चिरगुटां नाहीं कसी वाढ गे? ॥
किंतू वाढत जातसे मरदितां हे कूच हस्तें पैलीं ॥
तेव्हां ती उपमा गिरी जरि म्हणूं तीही नसे चांगली॥ ५
सिंहानें कटि पाहुनी मनिं बहू दुःखीत तो जाहला ॥
हस्तीही मनिं पावला भय, सखे, चालावया चांगला ॥

१ दिवसें दिवस. * आकाशांत.

ऐशी चाल तुझी. हळू हळु सुखा पाहूनियां वाटतें ॥
वाटे मानसिं हर्ष फार मजला आलें फळा दैव तें ! ॥६
कांते, भाषण मंजुळ प्रियसखे हें गोड वाटे मला ॥
गालीं प्रेमभरें हसून रुसुनी थट्टेपरी कोमला ॥
ब्रह्मे[1] होइल दृष्ट तूज ह्मणुनी काळें वपु[2] लाविलें ॥
नेत्रीं ती भ्रुकुटी तसें स्तनिं दिसे कृष्णौ[3]हिं तें शोभलें ॥७

चंपकमालती–( संतोषानें ) उगीच कशाला व्यर्थ आपल्या मुखकमलास, ह्या सूर्यविकासित कमलिनीकरितां, शिणवितां ? ( घड्याळाकडे पाहून ) बारा वाजायला आले. चला आतां निजायला. मला बाई, झोंप येते.

माधव–[आलिंगन देऊन] बरें आतां निजायचें तर आहेच.

चंपकमालती–( हंसून ) बरं मग ?

माधव–मग एक साखरेचा * *

चंपकमालती–[हंसून दूर होण्यास सरसावतें परंतु माधवाच्या हातून जाऊं शकत नाहीं असें पाहून ] बरें, पण हळूच घ्या. उगीच दातांचे वण उठतील. [ असें ह्मणून माधव तिचें प्रेमेंकरून चुंबन घेतो ].

माधव–चला आतां शयन करूं. ( निजूं लागतात तों माधव स्त्रियेस म्हणतो ) प्रिये, येवढ्या रात्रीं कोण बरें मला मोठ्यानें हांका मारीत आहे ?

चंपकमालती–[ कानोसा घेऊन ] खरंच बाई, कोण असेल तें असो. [ दासीस हाक मारून ] दासी, कोण आहे पाहून तर ये बरं. ( दासी पाहून येते ).

---

१ ब्रह्मदेवानें. २ अंगास. ३ काळ्यावर्णामुळें.

दासी–कुटला एक शिपाई आला आहे.

माधव–जा तर, आंतमधें घेऊन ये त्याला.

शिपाई–[नमस्कार करून] महाराज, सूर्यकांत प्रधानजी-ने आपको एक कामके वास्ते जलदी बुलाया है.

माधव–[घाबरल्यासारखें करून] कशाला बरें? कांहीं कारण? विक्रमाची स्वारी गांवाहून परत आली आहे काय?

शिपाई–[हात जोडून] यह मुझे मालूम नहीं. लेकिन इतना मालूम है कि देवनगरीसे किसीकी चिट्ठी आई है, सो आपको थोडी देरके वास्ते जरूर बुलाया है.

माधव–फार उत्तम आहे. [घाईघाईने चंपकमालतीस पुसतो] मी आतां जाऊन येतों बरें. दरवाजा उघडाच असूंदे (शिपायासह निघून जातो).

चंपकमालती–[मनांत सखेदाश्चर्यें करून म्हणते] काय करावं, कर्माची गती विचित्र आहे. भोगणं असेल तें भोगल्या खेरीज सुटत नाहीं हें खरं आहे. [नेत्रांत आंसवें आणून] परमेश्वरा, सुदैवेंकरून मला ही अलभ्य मूर्ति सहज मिळाली तों हें भयंकर विघ्न आलं. देवनगरीचें प्राणसख्यांच्या नांवाचं जर पत्र आहे तर कामकंदलेच्या मृत्युवार्तेखेरीज दुसरं कसलं असायचं! [उसासा टाकून] काय होईल तें होवो! परमेश्वरा, ह्यावेळेस तूंच आहेस. माझं प्रालब्धच तसं आहे; त्याला काय उपाय? हर प्रयत्नानं मी ही गोष्ट उडविली होती तों ती माझ्या पुढं धांव

घेत येथें आली! शिव शिव!! मारेकऱ्यांच्या हातांतून निसटल्यावर जीं जीं विघ्नें व संकटें मला प्राप्त झालीं तितकींही मी सख्याच्या संगतीनें विसरलें होतें. असो! (कपाळावर हात मारून स्वस्थ बसते!)

पडदा पडतो.

प्रवेश १ ला समाप्त.

---



## प्रवेश २ रा.

---

स्थळ—अरण्य.

पात्रें.

विक्रम ..................अवंतीचा राजा.
वेताळ..................पिशाच पती.
विदूषक..................सूत्रधाराचा मित्र.
सूत्रधार..................नाटकाचार्य.

विदूषक—[ खुर्चीवर बसून ] कांहो सुत्रधार, आजपर्यंत मी तुम्हाला चांगले संभावीत गृहस्थ ह्मणत असतां अखेर मला तुह्मी घोटाळ्यांत पाडलेंना? वहावारे वहावा:! खुरच केलीत!!

सूत्रधार—अरे तुला, असें घोटाळ्यांत पडण्यास झालें काय? सांगशील तर खरें? मी कधींही गुह्य गोष्ट षट्कर्णीं करणार नाहीं, येवढी खात्री असूंदे.

विदूषक—आतांचे आतां येथें कोंबडा कोंबडी आनंदाने कुकूचकू करीत अन्योन्यावर चढत होतीं तों दुसरा एक कोंबडा येऊन त्या कोंबड्यास घेऊन गेला आणि त्या बिचाऱ्या कोंबडीस तसंच टाकल्यावर, ब्रह्मदेवाच्या पितामहाचे सावत्रं पित्याचे सावत्र पंतू आपण अरण्याचा भास करवूं लागलां!

सूत्रधार—अरे, आतां ह्या ठिकाणीं राजाधिराज विक्रम

भूपतीची स्वारी 'कामकंदुलेच्या मरणवार्तेनें म्हण किंवा विरहानें माधव मरण पावला ह्मणून त्यास उठविण्या- करितां येथें यत्न करण्याकारितां प्राप्त होईल. नंतर पुढें जें कार्य होईल तें स्वस्थमानसें अवलोकन कर.

**विदूषक**–अरे! अरे! अरे! अरे! हें तर फार वाईट झालें! (उसासा टाकल्यासारखें करून) असो, **विदूषक**पंताच्या मर्जीपुढें कुणाचा उपाय आहे? (इतक्यांत **विक्रम** शोक करीत प्रवेश करतो).

**विक्रम**–[डोळ्यांत आंसवें आणून] शिव शिव हे शंकरा! ह्या अनाथ बालकावर कसारे इतका रोष केलास? करण्यास गेलों काय? आणि झालें काय? खरोखर ह्या जगतांत माझ्यासारखा अन्यायी, पापी व कपटी कोणीही नसेल. इकडे ब्रह्महत्या व तिकडे स्त्री हत्या, या पातकाचें कोठें झाडे देऊं! अहाहा! काय त्या उभयतां स्त्रीपुरुषांचें प्रेम बरें; वास्तवीक **कामकंदला** ही वेश्या नव्हे, पूर्वजन्मीची कोणी पतिव्रता होय! ह्याचेंच नांव प्रीति! परमेश्वरा, तुझी लीला अगाध आहे! आजकाल सर्व तूं उलटेंच दाखवूं लागलास काय? ज्या **रतिप्रिये**सारखी पतिव्रता स्त्री कुठंही नाहीं असें स्त्रीलंपट **कामसेनास** वाटत होतें तिलाही पापवासना होऊन यमपुरीस पाठविलेंस काय? व **काम- कंदला** ही प्रत्यक्ष वेश्या असतांही इच्या सारखी पतिव्रता नाहीं म्हटलें तरी चालेल! (मनाशीं) अरे पातक्या **विक्रमा**, परोपकाराविषयीं तुझी कीर्ती तिन्ही लोक गात असतां जर त्यांना हें तुझें दुष्कर्म समजलें

तर इंदूवत् कलंकबिंदू लागेलना? शिव शिव! आतां शरीराचा त्याग करावा हेंच शहाणपणाचें काम होय. परमेश्वरा, आतां तूं आपल्या चरणांजवळ तरी उत्तम रीतीनें ठेव. (मनांत धैर्य धरून इकडे तिकडे पाहतो) मारिषा! सख्या, आहेसना ?

विदूषक–हो प्राणपती आहें बरं मी.

विक्रम–ही चावटपणाची वेळ नव्हे, लौकर जाऊन अरण्यांतील काष्टें जमा करून मोठें अग्नीकुंड रच.

विदूषक–कां बरें?

विक्रम–ह्या पापी कलेवराचें मला निर्दालन करून भस्म करणें आहे. [आंसवें पडतात].

उद्धर्षिणी.

काष्टें जमा करुन भूपति साह्यतेनें ॥
स्नानासि सारुन तयें बहु दक्षतेनें ॥
भूपें पहा करुन उज्वल ज्वाळमाळी ॥
पूजाविधी करुन प्रार्थित तो न काळीं ॥ १ ॥

[ तदनंतर **विक्रम** अग्निकुंडास तीन प्रदक्षणा घालून प्रेमभरीत सद्गदीत होऊन, नेत्र लावून, हात जोडून अग्नीची स्तुती करतो]

भुजंग प्रयात.

अहो वन्हिराजा तुह्मांतें नमीतों ॥
करा जोडुनी शीर पादीं लवीतों ॥
असें आपराधी तुझा दास देवा ॥

कधीं नाहिं केली तुझी मी सुसेवा ॥१॥
तरी आपराधा क्षमा वन्हि कीजे ॥
मला घेइ तूं उदरीं सांठवीजे ॥
जरी आयकीली तुवां ब्रह्महत्या ॥
स्त्रियेची तशी पापनाशा करी त्या ॥२ ॥
रथाच्या भरीं मारिले अल्पप्राणी ॥
तरी मेंढरा मर्दिल्या होतवाणी ॥
अशीं मेंढरें मारिलीं हो शतांनीं ॥
तरी बैल तो मारिला सूतवाणी ॥३॥
शता नंदिना टाकिलें मर्दुनीयां ॥
तरी मर्दिली गाय वाटे मनीं या ॥
जरी मारिल्या शंभरा गाय वाटे ॥
[illegible] र्दिला द्वीज हो, दुःख वाटे ॥४॥
[illegible] ब्राह्मणां मर्दिलें कीं विभूरे ॥
[illegible] र्दिली अग्निराया, वधू रे ॥
असा पापि मी जाहलों आज देवा ॥
कृपेनें, प्रभो, अंगिकारी, न, हेवा ॥५॥

(डोळ्यांत आसवें आणून) अहाहा! हे अग्निनारायणा, आतां माझा अंत न पहातां ह्या बालकास तुझ्या वि-शाळ उदरीं जागा दे. हे त्रिपादा, कां रे ह्या बालकासीं अझून संभाषण करीत नाहींस? मी पापी ह्मणून माझा त्याग केलास कीं काय? हे मम्साह्यकारा वेताळा, धांव; तुझ्यावांचून व चत्वांरीशृंग महाराजावांचून मला ह्या

१ अग्नि.

जगतांत कोणी नाहीं.। हे सर्पकरा, घे आतां ह्या पाप्यास आपल्या उदरामधें! [असें ह्मणून उडी टाकूं लागतो तों]

( शार्दूल विक्रीडित. )

**नरसिंहावत् तोंड, सोंड मजला बाहू करीची खरी ॥**
**वाटे, घाबरतो, खरा कृपण हो, द्रव्यामुळें, ज्यापरी ॥**
**हस्तीचे जणु पाद, लाल खदिरांगारापरी नेत्र ते ॥**
**दैत्यासारिखि आकृती, प्रगटले वेताळस्वामी तिथें॥ १॥**

**वेताळ**–(घाबरेपणानें अलूलूलूलू करीत प्रवेश करून वि**क्रमास** प्रेमालिंगन देऊन म्हणतो) हे प्रियभक्ता, मी तुला सदैव साह्य असतां, कोणत्या संकटामुळें ह्या अमोल्य शरीराचें हनन करण्यास तयार झाला आहेस? वत्सा.

**विक्रम**–[आनंदानें त्या [illegible] करतो] अहाहा! वेता[illegible] सांगूं? अहो, दुःख [illegible] परिहार करूं शकेल. समजलांत? जर आपण हे कार्य शेवटास न्याल तर फार उत्तम आहे, नाहीं तर ह्या बालकास आतां, विलंब न लावितां, अग्निप्रवेश करण्याची आज्ञा द्यावी. [अग्निकुंडाकडे पाहून] प्रवीरजामाता, ह्या पाप्याला उदरीं साठविण्याकरितां तूं आपल्या ज्वाळानामक भार्येसहवर्तमान उभा आहेस काय? अहाहा! (अश्रू पतन होतात) वेताळा, चला आतां सोडा मला.

**वेताळ**–ओ हो! वत्सा, प्राप्त झालेल्या संकटाचें, प्रतिज्ञा-

१ अग्नि.

पूर्वक सांगतों. निवारण करीन. व तुझें कार्य निर्विघ्न-
पणें शेवटास जाईल हा माझा पूर्ण आशिरवाद आहे,
काय संकट प्राप्त झालें आहे तें कथन कर.

विक्रम-[हात जोडून] सांगतों हें श्रवण करा:-

साक्या.

एके दिवशीं, वेताळा, मी, शिकार करण्या गेलों ॥
श्रमुनी, सखया, वृक्षाखालीं, विश्रामासीं बसलों॥१॥
इतक्यामध्यें वृक्षा आडुन, रूदन ऐकूं आलें ॥
धांवत धांवत जाउन तेथें, द्विजातें मी नमिलें ॥२॥
हस्तातें, प्रभु, जोडुन तेव्हां, प्रार्थिलें मी त्याला ॥
वेश्या[1] देउन, मारी भूपा, कामासी[2], तूं मजला ॥३॥
कबूल करुनी ह्या वचनातें, स्वग्रामीं आणीला ॥
प्रीति ह्यांची[3] पाहुनियां मग, मारूं ह्या राजाला ॥४॥
विचार करुनी मनीं ऐसा, सुषेणवेशा धरिलें ॥
सखया, पर उपकाराचें तें, पुण्यच ह्मणुनी करिलें ॥५॥
वेशा घेउन वैद्याच्या[4] मी, देवनगरीं गेलों ॥
सांगुन मृत्यूवार्ता तिजला, प्रीति पाहूं गेलों ॥६॥
श्रवणीं पडतां मृत्यूवार्ता, सोडीलें प्राणातें ॥
तद्वत इकडे माधव यानें, ऐकुन स्त्री मृत्यूतें ॥७॥
धन्य धन्य ती प्रीती त्यांची, नाकीं[5] दोघे गेले ! ॥
ह्मणून अग्नीमध्यें, देवा, शरीर भस्मचि केलें ॥८॥
इतुक्यामध्यें दयाळा रे, वाचविलें तूं मजला ॥
तुला नमूनी प्रार्थितसें मी, जिववी त्या दोघांला ॥९॥

---

१ कामकंदला. २ कामसेन राजास. ३ कामकंदला आणि माधव. ४ वैद्यवेश. ५ स्वर्गी.

प्रवेश ३ रा.

---

स्थळ–अरण्य.

पात्रें.

अवंतीचा राजा.

क राक्षस.

बहू सुखें धामीं ॥
पती सुविश्रामीं ॥ १ ॥

अद्वितीय शोभेचें वर्णन
चहूंकडे हारीहारीनें अंब
ुवन करणारे घनदाट वृक्ष
ालीकडेही तसेच रांगेनें गुलाब,
शे आदि अर्जून केदारादिक वृक्ष उभे असून जागजागीं मोत्यांच्या घोसाप्रमाणें सुगंधीत ताज्या फुलांचे जें गुछ आल्याकारणानें त्यांच्या भारानें जसे लवले आहेत ! तसेंच सरोवरांत पाणीही स्वच्छ असून किती मधूर आहे ! ह्या सूर्यविकासित सुवर्ण कमलांवर अस्तास जाणाऱ्या भानूचें शिळें किरण पडल्यामुळें कोमेजण्याच्या बेतांत आहेत कीं काय असें वाटतें ! चाऱ्ही बाजूंनीं आंत उतरण्याकरितां पाचूच्या पायऱ्या तरी कशा शान बांधल्या आहेत ! खरोखर हें रमणीय स्थळ, एखाद्या विलासी गंधर्वाचें

आपल्या स्त्रीसहवर्तमान जलक्रीडा करण्याचें, असावें. दिवसभर एकसारखा चालून थकल्यामुळें येथें प्राप्त झाल्यानें वसंतऋतूंतील सायंकाळच्या शीत व मंदमंद वाहणाऱ्या वायुद्वारें किती मानसाचे ठायीं अल्हाद होत आहे! [ वर पाहून ] अहा! काय चमत्कार आहे! ह्या डोंगराच्या टेंकडीवर हा रत्नखचीत महाल कोणाचा असावा बरें! मंदिराच्या दरवाज्यावर इंद्रचापासही लाजविणारी कमान असून चहूंकडे पिंजऱ्यासारखे गज लाविलेले आहेत. अरे, हा पिंजरा तर नसावा! [ निरखून पाहून ] अरे, हो! हा पिंजराच आहे. काय ह्या पिंजऱ्याचें वैभव! ( कांहीं वेळ टक लावून ) आंत मधें कोणी तरी आहेसें वाटतें. चला बरें जाऊन तर पाहूं काय आहे तें! ( पिंजऱ्या जवळ जातो ) अहाहा! काय बरें ह्या अबलेची दुर्घट स्थिती ही! शिव शिव! कोणाची स्त्री असावी कोण जाणें. जवळ जाऊन उठवावें तों पिंजरा चहूंकडून बंद आहे. हे चंपककलिके! अहाहा! स्वरूप तरी तुझें किती उत्तम आहे! शाबास त्या विधात्याची! कोणा दुष्टानें तुला पिंजऱ्यामध्यें कोंडलें आहे! हे भगिनी, सावध हो. तुझी ह्या पिंजऱ्यांतून सुटका करण्यांकरितां हा विक्रम येथें प्राप्त झाला आहे.

स्त्री–[ डोळ्यांत अश्रू आणून ] अहाहा! बांधवा, मुकाट्यानें आपला प्राण घेऊन आल्या वाटेनें परत जा. अग आई ग! आलाग मेला त्रांस देण्याला. [ पुन्हा मूर्छित होते. ]

विक्रम–( गहिंवरून ) शिव शिव! काय विचित्र स्थिती ही! बोलली काय? आणि मूर्छित झाली काय? कांहीं होवो, प्राण जावो अथवा राहो, मी ह्या दीन अबलेस ह्या दुःखपाशांतून काढल्याशिवाय तर राहणार नाहीं. ( तिच्याकडे पाहून ) कशी विचारी भयाभीत होऊन पडली आहे! तोंडावाटे लाळ गळत आहे तरी तिला कांहीं ठाऊक नाहीं. हर हर! वास्तवीक अशा पतिव्रता सुंदरींनां पर्वतासारखीं महत्‌संकटें प्राप्त होण्यास 'रूप' हेंच कारण होय. पहा पहा, केंस कसे पिंजारले आहेत; मला वाटतें, विरहाच्या योगानें पिकलेल्या निंबाप्रमाणें सुकांतीस पांडुर वर्ण प्राप्त झाला आहे! हाता पायांत तर बिलकुल शक्ती राहिलीसें वाटत नाहीं. अशा सुंदर व तरुण कुमारीस, सध्यां केवळ प्रेताची कळा दिसत आहे. आणखीं एकदां हांक तरी मारून पहावी. [ उघड ] हे स्त्रिये, सावध हो.

स्त्री–( उठून उभी राहते ) भूपा, आपण कृपा करून येथून लौकर जावं; येवढीच हात जोडून आपणांस विनंती आहे. माझ्या नादीं लागल्यास व्यर्थ प्राणहानी होणं आहे.

विक्रम–कांहीं चिंता नाहीं. जरी माझा प्राण गेला तरी चिंता नाहीं, परंतु, आज तुझी ह्या पिंजऱ्यांतून सुटका केल्याखेरीज राहणार नाहीं. कोण्या दुष्टानें तुला येथें अशा स्थलांत आणून टाकलें आहे तें लौकर सांग

ह्मणजे तावडतोब त्याचा नाश करून तुला बरोबर घेऊन जाईन.

**स्त्री**–[ सद्गदीत होऊन ] अहाहा ! हे सत्पुरुषा, ईश्वर तुझें कल्याण करो; ह्या अरण्यामध्यें '**वज्रशील**' नांवाचा निशाचर रात्रंदिवस भ्रमण करीत असतो, व मला माझ्या पातिव्रत्याचा भंग करण्याकरितां फार फार छळितो. जरी मला इतका तो रोज त्रास देतो तरी मला दुष्कर्माबद्दल परमेश्वरानं बुद्धि दिली नाहीं. ( रडूं लागते ) रोज मेला माझा छळ करण्याकरितां दुसऱ्या पिंजऱ्यांत मला निर्दयपणें कोंडून त्यासह ह्या तलावांत उडी टाकतो ! राजेश्वरा, नाका तोंडांत पाणी गेल्यावर मी बेशुद्ध होऊन शुद्ध प्रेताप्रमाणें पिंजऱ्यांत निचेष्टित पडतें. ह्या प्रमाणें मी असावध असतां पुन्हा पहिल्या पिंजऱ्यांतून काढून दुसऱ्या पिंजऱ्यांत टाकतो आणि मला थोडेंसें खाण्याकरितां कांहीं फळंबिळं टाकून आपण मेला अरण्यांत हिंडण्यास जातो. झालं, आतां संध्याकाळ झालीच आहे, मेला ह्या वेळेस पळत पळतच येत असेल. [ भयाभित होऊन कांपूं लागते ].

**विक्रम**–स्त्रिये, येथें आतां भिण्याचें कांहीं एक काम नाहीं. ईश्वरानेंच ह्या राक्षसाचा वध करण्याकरितां आणि तुझी सुटका करण्याकरितां येथें पाठविलें आहे. ह्या दुष्ट निशाचराशीं युद्ध करते. वेळेस मनोभावेंकरून, कैलासवासी श्रीसांबाची, मला जय प्राप्त व्हावा एतदर्थ प्रार्थना कर ह्मणजे झालें.

ओंवी.

**बोलत आहे इतक्यांत, राक्षस आला धांवत ॥**
**महा भयंकर अत्यंत, ह्मणे, दुष्टे परिसे ॥ १ ॥**

**वज्रशील**—चांडाळे, तुला धरल्यापासून सहस्त्र वेळां तुझी त्याबद्दल मी प्रार्थना केली असेल, त्याचप्रमाणें तुला छळलेंही फार, जें करून तुला क्लेश प्राप्त व्हावेत ह्मणून रोज तलावांत फेंकून देत असतों तरी तूं माझी भीति सोडून येथें क्रीडा करण्याकरितां त्या नपुंसक जारास पाचारण केलेंस ना ! कांहीं चिंता नाहीं. नांवाचा **वज्रशील** असून जर निशाचर असेन तर तुझ्या समक्षच तुझ्या जाराचा नाश करून तसा कच्चाचेकच्चाच खाऊन टाकितों. घाबरतेस कां आतां ? कबूल होशील तर बरें नाहींतर आतां मात्र तुझी आशा न करितां तुलाही भक्षण करीन. चिंता नाहीं. [ इकडे तिकडे पाहून ] कोण आहेरे कार्ट्या ? **विक्रमास** धरण्याकरितां पुढें सरसावतो).

**विक्रम**—( तरवार पुढें करून ) हं, खबरदार ! विचार करून मग अंगावर ये. समजलास ? नांवाचा **विक्रम** आहे.

**वज्रशील**—[ मोठ्यानें ओरडून ] अरे कार्ट्या ? ह्या **वज्रशीला**बरोबर जर जास्त वल्गना केलीस तर एकाच शस्त्राच्या घायें करून एका क्षणामधें जिव्हा छेदन करून टाकीन. अरे नपुंसका, आयत्या बिळावर नागोबा होण्यास पाहतोस कीं काय ? थंढा, अरे नि-